तालुका फळरोपवाटिका-पैठण प्रक्षेत्राऐवजी तालुका बीज गुणन केंद्र, इसारवाडी येथील प्रक्षेत्रावर मोसंबी फळपिकासाठी “सिट्रस इस्टेट” ची स्थापना करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी ,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सिईओ-२०२२/प्र.क्र.२५९/९-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०६ मार्च, २०२३

संदर्भ :- १. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक : सिईओ-२०२१/प्र.क्र.१७३/९-अे, दि. १३ जानेवारी, २०२२
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक : फरोवा-२०२२/प्र.क्र.१९१/१३-अे, दि. २२ नोव्हेंबर, २०२२
३. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र. कृ.आ./फलो-२/पै.इस्टेट सुधा प्र./३७२५२/२०२२, दि. ०७.११.२०२२

**प्रस्तावना :-**

औरंगाबाद जिल्ह्यातील तालुका फळरोपवाटिका-पैठण प्रक्षेत्रावर मोसंबी फळपिकासाठी "सिट्रस इस्टेट" ही योजना राबविण्यास तसेच "सिट्रस इस्टेट" ची स्थापना करण्यास उपरोक्त संदर्भाधीन दि. १३.०१.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच तालुका बिज गुणन केंद्र ईसारवाडी ता. पैठण, जि. औरंगाबाद हे प्रक्षेत्र तालुका फळरोपवाटिका, ईसारवाडी मध्ये रुपांतर करण्यास उपरोक्त संदर्भाधीन दि. २२.११.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन क्रमांक ३ येथील प्राप्त प्रस्तावास अनुसरुन औरंगाबाद जिल्ह्यातील तालुका फळरोपवाटिका-पैठण प्रक्षेत्र सलग नसल्याने तसेच मोसंबी पिकाच्या निरोगी व सुदृढ वाढीसाठी योग्य नसल्याने सदर रोपवाटिकेच्या प्रक्षेत्राऐवजी तालुका बीज गुणन केंद्र, इसारवाडी येथे रुपांतरीत केलेल्या तालुका फळरोपवाटिकेच्या प्रक्षेत्रावर मोसंबी फळपिकासाठी "सिट्रस इस्टेट" स्थापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुलक्षून शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

औरंगाबाद जिल्ह्यातील तालुका फळरोपवाटिका-पैठण प्रक्षेत्राऐवजी तालुका बीज गुणन केंद्र, इसारवाडी येथे रुपांतरीत केलेल्या तालुका फळरोपवाटिकेच्या प्रक्षेत्रावर मोसंबी फळपिकासाठी "सिट्रस इस्टेट" स्थापित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वेय स्थापित केलेल्या "सिट्रस इस्टेट" साठी उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दिनांक १३.०१.२०२२ रोजीच्या शासन निर्णयामधील इतर सर्व तरतुदी लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३०६१२४७५११८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.03.06 12:51:51 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र राज्य.
६) मा.राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) मा.विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) प्रधान सचिव (कृषि) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
११) आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१२) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१३) विभागीय कृषी सहसंचालक, औरंगाबाद.
१४) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, औरंगाबाद.
१५) सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१७) संचालक, लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई ( २ प्रती)
१८) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
१९) कक्ष अधिकारी, कार्यासन १३अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२०) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२१) निवड नस्ती.